**अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर कार्यालयांतर्गत कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांसाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदास मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२१/प्र.क्र.३२/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०२ मे, २०२३

**संदर्भ** : १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९ व दि.२८ ऑक्टोबर, २०२१.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१९/प्र.क्र.५८१ ए/१६-ब, दि.१४ डिसेंबर, २०२२
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२०.
४) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.०१ ऑगस्ट, २०२२.
५) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर यांचे दि.०८ फेब्रुवारी, २०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.२८ ऑक्टोबर, २०२१ मधील तरतुद विचारात घेऊन, शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, दि.०१ ऑगस्ट, २०२२ अन्वये अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर अंतर्गत अधिसंख्य पदावर कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांच्या अधिसंख्य पदास दि.२५ मार्च, २०२२ पासून दि.२४ फेब्रुवारी, २०२३ पर्यंत किंवा सदर कर्मचारी सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. दरम्यान शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.१४ डिसेंबर, २०२२ अन्वये अधिसंख्य पदास ०१ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन मुदतवाढ देणेबाबत निर्देश देण्यात आले आहेत. त्यासअनुसरुन अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर अंतर्गत अधिसंख्य पदावर कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांच्या अधिसंख्य पदास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.१४ डिसेंबर, २०२२ अन्वये अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर अंतर्गत कार्यरत असलेल्या खालील कर्मचाऱ्यांसाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदास दि.२५ फेब्रुवारी, २०२३ या ०१ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन दि.२६ फेब्रुवारी, २०२३ पासून दि.२५ जानेवारी, २०२४ पर्यंत किंवा त्यांच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कर्मचाऱ्यांची नावे | पदनाम व गट | नियुक्तीचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १. | श्री. रविंद्र हरिभाऊ हांडे | कनिष्ठ लिपिक गट-क | २५/०८/१९९४ | ३१/०७/२०२७ |
| २. | श्री. गंगाधर मा. पौनिकर | कनिष्ठ लिपिक गट-क | ०२/११/१९९२ | ३१/०१/२०२८ |
| ३. | श्रीम. वनिता न. झिले (चिडे) | सहायक आरेखक गट-क | २५/०९/१९९७ | ३०/०६/२०३२ |

२. वर नमूद कर्मचारी सद्य:स्थितीत अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असल्याने त्यांच्या वेतनावर होणारा खर्च त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधिच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९ व क्र. बीसीसी -२०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२० रोजीच्या तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. बीसीसी २०१९/ प्र.क्र.५८१ ए/१६-ब, दि.१४ डिसेंबर, २०२२ या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०५०२१६१०२२२७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO

Digitally signed by SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=1fbca76d11ad25e383a0e28da215f01e12183c1b565ddd29aaf1ffbfad8e9e9c, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6F385E4139AB144CAAF92B440B55068479C3789EA50EC85EB7A16B7C932CB397, cn=SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO
Date: 2023.05.02 16:19:41 +05'30'

**( विक्रमसिंह प्र. शिंदे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-** १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर.
२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.

**प्रत :-** १) अपर मुख्य सचिव (सा.बां.) / सचिव (रस्ते) / सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
४) महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी , नागपूर / गडचिरोली / गोंदिया / चंद्रपूर.
६) कार्यासन सेवा-३ / सेवा-४ सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवडनस्ती.